राज्यातील अल्पसंख्याक समुदायातील विद्यार्थ्यांकरीता परदेशात पदव्युत्तर पदवी व पी.एच.डी. अभ्यासक्रमासाठी शिष्यवृत्ती योजनेकरीता नवीन लेखाशीर्ष उघडण्यास मंजूरी देण्याबाबत....

# महाराष्ट्र शासन

## अल्पसंख्याक विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०२३/प्र.क्र.१००/का.६,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १४ मे, २०२४

**वाचा :** अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०१९/प्र.क्र.२११/का.६ ,दि. २३ नोव्हेंबर, २०२३.

**प्रस्तावना -**

अल्पसंख्याक विकास विभागामार्फत राज्यातील अल्पसंख्याक समुदायातील विद्यार्थ्यांकरीता परदेशात पदव्युत्तर पदवी व पी.एच.डी. अभ्यासक्रमासाठी शिष्यवृत्ती योजना राबविण्याकरीता संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेच्या अर्थसंकल्पविषयक बाबी हाताळण्याकरीता नवीन लेखाशीर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

राज्यातील अल्पसंख्याक समुदायातील विद्यार्थ्यांकरीता परदेशात पदव्युत्तर पदवी व पी.एच.डी. अभ्यासक्रमासाठी शिष्यवृत्ती योजना राबविण्याच्या अनुषंगाने अर्थसंकल्पिय तरतुद करणेकरीता खालीलप्रमाणे नवीन लेखाशीर्ष उघडण्यास मंजूरी देण्यात येत आहे :-

| | **लेखाशीर्ष मराठी** | **लेखाशीर्ष इंग्रजी** |
|---|---|---|
| **योजनेचे नाव** | परदेशात पदव्युत्तर पदवी आणि पी.एच.डी. करत असलेल्या अल्पसंख्याक विद्यार्थ्यांना परदेशी शिष्यवृत्तीसाठी सहायक अनुदान. (कार्यक्रम) (२२३५ डी६१३) | Grants in aid for Foreign Scholarship to Minority Students pursuing Post Graduation and Ph.D. in abroad. (Scheme) (2235 D613 ) |
| मागणी क्रमांक. | झेडई-१ | ZE-1 |
| मुख्य लेखाशिर्ष | २२३५ ,सामाजिक सुरक्षा व कल्याण | 2235, Social Security and Welfare |
| उप मुख्यलेखाशिर्ष | ०२ ,समाज कल्याण | 02, Social Welfare |
| गौण शिर्ष | २०० ,इतर कार्यक्रम | 200, Other Program |
| गटशिर्ष | 00 | **00** |
| उपगटशिर्ष | (००)(२१) अल्पसंख्याक विद्यार्थ्यांकरीता परदेशात पदव्युत्तर पदवी व | (00)(21) Grant in Aid for Foreign Scholarship to Minority Students pursuing Post Graduation and |

| | | |
|---|---|---|
| | पी.एच.डी. साठी शिष्यवृत्ती योजना (कार्यक्रम). (२२३५ डी ६१३) | Ph.D. in abroad. (Scheme) (2235 D 613) |
| **उद्दीष्ट** | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | 31-Grant- in- Aid (Non-salary) |
| | ३४, शिष्यवृत्या / विद्यावेतने | 34, Scholarships/Stipends |

२. सदर शासन निर्णय महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.सं.ख.वि.चा-१/अल्पसंख्याक विकास विभाग/युओआर-१८१/२०२३-२४/१२२५, दिनांक २१/२/२०२४, नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ४०२/१४७१, दिनांक १५.१२.२०२३ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १६०/व्यय-१/२०२४ दि.८/५/२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५१४१३०१०८५६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PARVEEN JAVED JUGARI

Digitally signed by PARVEEN JAVED JUGARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=7756c9321eaddbc49e6838c15545ed29cc20adf253d62a3e9c3655f35e48b136, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=33DA49010D9298976BDFC5AFC6237D485983227E0643169266E6A377187E832D, cn=PARVEEN JAVED JUGARI
Date: 2024.05.14 13:16:22 +05'30'

**( परवीन जुगारी )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

(१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई,
(२) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई
(३) सर्व जिल्हाधिकारी
(४) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
(५) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
(६) सह संचालक,(सुधारणा), संचालनालय लेखा व कोषागारे, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मंत्रालय, मुंबई.
(७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
(८) संबधित जिल्हा कोषागार अधिकारी.
(९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
(१०) नियोजन विभाग का. १४७१, मंत्रालय, मुंबई
(११) वित्त विभाग, व्यय-१/ अर्थ-३ व १४, मंत्रालय, मुंबई
(१२) अवर सचिव (का. ६), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
(१३) निवड नस्ती (का.६).